**राज्यातील मध्यवर्ती अंडी उबवणी केंद्र, पुणे, कोल्हापूर, नागपूर व औरंगाबाद व बदक पैदास केंद्र, वडसा या पाच प्रक्षेत्रांचे महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ यांच्याकडे हस्तांतरण करणे बाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि पशुसंवर्धन दुग्धव्यवसाय विकास व मस्त्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्र. कुक्कुट-२०२२/प्र क्र.१३/पदुम-४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक :- २९ एप्रिल, २०२२

वाचा :-

१. आयुक्त पशुसंवर्धन, पुणे यांचे पत्रक्र कुक्कुट -२/प्र. क्र. ७२६ / CH हस्तांतरण /११२१-२२ /२०२२, पसं-१३, पुणे, दि. २०.०१.२०२२

२. महाराष्ट्र पशुधन विकास मंडळाच्या संचालक मंडळाची सभा दि. ०१.०२.२०२२ अन्वये पारीत करण्यात आलेला ठराव क्र. ८३(३)

प्रस्तावना :-

राज्यात पशुसंवर्धन विभागांतर्गत पुणे, कोल्हापूर, नागपूर व औरंगाबाद या चार ठिकाणी मध्यवर्ती अंडी उबवणी केंद्र व वडसा येथे एक बदक पैदास केंद्र असे एकूण पाच केंद्र कार्यरत आहेत. या प्रक्षेत्रांवर सध्या CARI, कावेरी, ग्राम प्रिया, कडकनाथ, गिरीराज, वनराज इत्यादी सुधारित जातींच्या पायाभूत कुक्कुट पक्षी कळपाची (Foundation Stock) जोपासना करण्यात येत आहे. या पायाभूत कळपाव्दारे ग्रामीण भागातील शेत-यांसाठी सुधारित जातींच्या कुक्कुट पक्ष्यांची उबविण्याची अंडी यांचे उत्पादन करून उबविण्याची अंडी, एक दिवसीय पिल्ले ना नफा ना तोटा या तत्वावर  वाटप केली जातात. त्याचबरोबर या केंद्रांद्वारे वेळोवेळी सुशिक्षित बेरोजगार व शेतकऱ्यांसाठी कुकुट पालन विषयक प्रशिक्षण दिले जाते. या प्रशिक्षणाचा ग्रामीण भागातील शेतकरी, महिला आणि सुशिक्षित बेरोजगार युवकांना व्यवसाय उभारणीसाठी मोठा फायदा होत आहे. याद्वारे देशी कोंबड्यांच्या सुधारित जातींचे संगोपन व नवीन सुधारित जातींचा प्रचार व प्रसार होण्यास मदत होते.

सन २०२०-२१ मध्ये कोविड-१९ या जागतिक महामारीमुळे राज्याच्या अर्थव्यवस्थेवर ताण आल्यामुळे अर्थसंकल्पित करण्यात आलेला निधी पूर्णपणे वितरीत होवू न शकल्यामुळे उपरोक्त सर्व संस्थांमध्ये क्षमतेप्रमाणे पायाभूत कळपांतर्गत कुक्कुट पक्ष्यांची जोपासना करता आलेली  नाही. औरंगाबाद येथील पक्षी गृह क्षमता एकूण ४,५०० पक्षी एवढी असून निधी उपलब्ध न झाल्याने येथील पायाभूत कळप विक्री करण्यात आला होता. सद्यस्थितीत येथे पक्षी संगोपन बंद आहे. बदक पैदास केंद्र, वडसा, जि. गडचिरोली येथे मूळ क्षमतेच्या ५०% एवढ्या क्षमतेने खाकी कॅम्पबेल या जातीच्या ३५० बदकांचा पायाभूत कळप आहे.

निधी अभावी उपरोक्त प्रक्षेत्रांवर कुक्कुट खाद्य देयके प्रलंबित आहेत. वेळेत निधी उपलब्ध न झाल्याने पायाभूत कळप तसेच नवीन कुक्कुट पिल्लांसाठी लागणारे कुक्कुट खाद्य खरेदी करण्यामध्ये अडचणी निर्माण होत आहेत.

सदर केंद्रांचे व्यवस्थापन करण्यासाठी चार मध्यवर्ती अंडी उबवणी केंद्र येथे एकूण ५२ व बदक पैदास केंद्र वडसा, जिल्हा गडचिरोली येथे ६ अशी विविध संवर्गातील एकूण ५८ पदे कार्यरत आहेत. आस्थापनेवरील खर्च तसेच प्रक्षेत्रांचे व्यवस्थापन या करिता येणारा खर्च राज्य शासनाच्या अनिवार्य खर्चामधून भागविण्यात येतो.

सन २०२० च्या मार्च महिन्या मधील लॉकडाऊन आणि जागतिक करोना महामारी मुळे राज्य शासनाकडून पुरेसा निधी वितरीत झालेला नाही. सर्व मध्यवर्ती अंडी उबवणी केंद्रांमध्ये जिवंत पक्ष्यांशी निगडीत कामकाज होत असल्याने खाद्य उपलब्धतेचा मोठा प्रश्न निर्माण झालेला होता. निधी कमतरतेवर उपाय म्हणून प्रक्षेत्रावर पक्षी संख्या कमी करण्यात आली किंवा संपूर्ण पायाभूत कळप विक्री करण्यात आला. सदर उपाययोजना ही दीर्घकालीन नसून कुक्कुट पक्षी खाद्य व औषधे, लसीकरण हे सातत्याने व वेळेवर करणे आवश्यक असल्याने प्रत्येक नवीन पक्ष्यांच्या तुकडीसाठी नव्याने खाद्य व इतर आवश्यक बाबींची उपलब्धता वेळेत होणे आवश्यक आहे. त्यानुसार, प्रत्येक वेळी निधीची उपलब्धता सुलभतेने करण्यासाठी अंमलबजावणीमध्ये स्वायत्तता आणणे गरजेचे आहे.

महाराष्ट्र पशुधन विकास मंडळाच्या घटना व उपनियमानुसार मंडळ हे सर्व पशुधनाशी निगडीत कामकाज पाहू शकत असल्याने मध्यवर्ती अंडी उबवणी केंद्रातील कुक्कुट पक्ष्यांशी निगडीत सर्व बाबी सुद्धा व्यवहार्यपणे सांभाळले जावू शकतात. त्याचप्रमाणे, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ ही एक स्वायत्त संस्था असल्याने निधी विषयक कामांसाठी संचालक मंडळाच्या बैठकीत तातडीने निर्णय घेवून वर विषद केल्याप्रमाणे कुक्कुट पक्ष्यांसाठी खाद्य व इतर आवश्यक बाबींची तातडीने उपलब्धता होऊ शकेल.

वरील सर्व बाबींचा विचार करता, राज्यातील चार मध्यवर्ती अंडी उबवणी केंद्र व बदक पैदास केंद्रांची स्थायी जंगम मालमत्ता आयुक्त पशुसंवर्धन, पुणे यांचे नावे ठेवून पाचही प्रक्षेत्रे महाराष्ट्र पशुधन विकास मंडळाकडे हस्तांतरण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याअनुषंगाने खालील प्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय** :-

राज्यातील मध्यवर्ती अंडी उबवणी केंद्र  पुणे, कोल्हापूर, नागपूर व औरंगाबाद तसेच बदक पैदास केंद्र, वडसा जि. गडचिरोली अशी एकूण पाच प्रक्षेत्रे, आहे त्या स्थितीत, स्थायी जंगम मालमत्ता आयुक्त पशुसंवर्धन, पुणे यांचे नावे ठेवून मंजूर अधिकारी / कर्मचारी पदांसह महाराष्ट्र पशुधन विकास मंडळाकडे हस्तांतरण करण्यास याद्वारे शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

सदर प्रक्षेत्रावरील जिवंत पक्ष्यांशी निगडीत दैनंदिन व अत्यावश्यक कामकाज जसे की, पक्षीखाद्य, लस, औषधी, पायाभूत कळपासाठी पक्षी / अंडी खरेदी, विद्युत देयक अदायगी, साठी शासनाकडून वेळेत निधी उपलब्ध होवू न शकल्यास अशा प्रसंगी महाराष्ट्र पशुधन विकास मंडळाने त्यांच्या स्वउत्पन्नातून निधी उपलब्ध करुन द्यावा. शासनाकडून अनिवार्य खर्चांतर्गत निधी वितरीत झाल्यानंतर सदर निधीमधून महाराष्ट्र पशुधन विकास मंडळाकडून खर्च करण्यात आलेल्या निधीची परतफेड करण्यात यावी.

तथापि, सदर प्रक्षेत्रावरील अधिकारी व कर्मचारी यांच्या वेतन व भत्यावरील खर्च तसेच इतर अनुषंगिक वेतनेत्तर अनिवार्य खर्च संकेतांक क्र. २४०३०४७२ अंतर्गत नियमित स्वरुपात शासनाकडून प्राप्त होणाऱ्या निधीमधून भागविण्यात यावा. सदर प्रक्षेत्रास शासनाकडून सध्या अनिवार्य खर्चांतर्गत निधी उपलब्ध होत आहे तो यापुढे प्रचलित पध्दतीने उपलब्ध करुन देण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०४२९१६४४०७३८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात आलेला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशाने व नावाने,

DR. SANJAY VISHWANATHRAO DOIJODE

Digitally signed by DR. SANJAY VISHWANATHRAO DOIJODE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=690002a7555559bb015f315b03adb3305c59fe381e4dcda1439d119129672733, pseudonym=B6831977DAFE9C462B1F5207DB8DC23334F34E62, serialNumber=5DBCE7AE3AC30F0E55C90CD14E851251037DC61F3291C80EA8638C44D41143AA, cn=DR. SANJAY VISHWANATHRAO DOIJODE
Date: 2022.04.29 16:46:00 +05'30'

**( डॉ. संजय वि. डोईजोडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री (पशुसंवर्धन दुगधव्यवसाय)यांचे खासगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. राज्यमंत्री (पदम)यांचे खासगीसचिव, मंत्रालय, मुंबई
५. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, औंध, पुणे.
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास महामंडळ, नागपूर
७. प्रधान महालेखांपाल (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर
८. सर्व प्रादेशिक सह आयुक्त पशूसंवर्धन,
९. सर्व जिल्हा पशूसंवर्धन उपआयुक्त,
१०. सर्व जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद,
११. सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, मध्यवर्ती अंडी उबवणी केंद्र, पुणे
१२. सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, मध्यवर्ती अंडी उबवणी केंद्र, नागपूर
१३. सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, मध्यवर्ती अंडी उबवणी केंद्र, कोल्हापूर
१४. सहाय्यक आयुक्त, मध्यवर्ती अंडी उबवणी केंद्र, औरंगाबाद
१५. पसुधन विकास अधिकारी, बदक पैदास केंद्र, वडसा, गडचिरोली
१६. अवर सचिव (पदुम -३) कक्ष अधिकारी (पदुम -१,२ व १६) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय मुंबई
१७. निवड नसती (पदुम-४).